सहाय्यक पोलीस अधीक्षक संवर्गाची आठ अधिसंख्य पदे निर्माण करणेबाबत.
परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवा अधिकारी-६६ वी तुकडी

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आयपीएस-०३१५/प्र.क्र.४६/पोल-१**
गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१,
जागतिक व्यापार केंद्र,कफ परेड, मुंबई-४००००५.
तारीख: ०४ मार्च २०१५.

**वाचा:-** विशेष पोलीस महानिरिक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र.टिआरजी-II/६६/आरआर /बॅच ट्रेनिंग/२६६/२०१४/५४११, दिनांक २३.१२.२०१४

**प्रस्तावना:-**

भारतीय पोलीस सेवेच्या ६६ व्या तुकडीतील खालील आठ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.२९.१२.२०१४ ते दि.११.०७.२०१५ ( ६ महिने १४ दिवस ) पर्यतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरीता 'सहाय्यक पोलीस अधीक्षकाची' आठ अधिसंख्य पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे. सदर पदे भारतीय पोलीस सेवेतील कनिष्ठ वेतनश्रेणीतील म्हणजेच रुपये १५,६००-३९,१०० + ग्रेड पे ५४००/- या वेतनश्रेणीतील आहेत.

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थीचे नांव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा |
|---|---|---|
| १ | श्री. बच्चन सिंह | ठाणे (ग्रामीण) |
| २ | कु. प्रियंका एन. भगत | उस्मानाबाद |
| ३ | श्री. हरीबालाजी एन. | पालघर |
| ४ | श्री. हर्ष ए. पोद्दार | औरंगाबाद |
| ५ | श्री. पंडित चिन्मय सुरेश | कोल्हापूर |
| ६ | श्री. पंडित महेंद्र कमलाकर | नांदेड |
| ७. | श्री. राज तिलक रौशन | परभणी |
| ८. | श्री. मंगेश पोपटराव शिंदे | धुळे |

उपरोक्त अधिकाऱ्यांच्या दि.२९.१२.२०१४ ते दि.११.०७.२०१५ (६ महिने १४ दिवस) या कालावधीतील वेतन व भत्ते यासाठी रुपये २७,१७,९०४/- ( रुपये सत्तावीस लाख सतरा हजार नऊशे चार फक्त ) एवढा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्याचे प्रस्तावित आहे. याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ६६ व्या तुकडीतील श्री. बच्चन सिंह व इतर ७ अशा एकूण ८ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना दि.२९.१२.२०१४ ते दि.११.०७.२०१५ ( ६ महिने १४ दिवस) पर्यंत महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक आणि त्यानंतर त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या जिल्हयात प्रशिक्षण कालावधीकरीता वेतन व भत्ते यावरील रु.२७,१७,९०४/- (रुपये सत्तावीस लाख सतरा हजार नऊशे चार फक्त) एवढया खर्चास शासन मंजूरी देण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस- १०९ (०१) जिल्हा पोलीस बल " या उपलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून वेतन व भत्ते या उद्दीष्टामधून सन २०१४-१५ व सन २०१५-१६ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

२. हा शासन निर्णय, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि २०१२/ प्र.क्र.६६/ १२/ वित्तीय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०४११२४००६२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Chandrakant Tambekar

Digitally signed by Charushila Chandrakant Tambekar
DN: CN = Charushila Chandrakant Tambekar, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2015.03.04 14:57:38 +05'30'

**( चारुशीला तांबेकर )**
शासनाच्या सह सचिव

प्रत,

- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

- विशेष पोलीस महानिरिक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
- संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
- संबधीत जिल्हा कोषागार अधिकारी,
- सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती).
- वित्त विभाग, व्यय-७ / वित्तीय सुधारणा-१/अर्थसंकल्प-३/ अर्थसंकल्प-१० / विनियम, मंत्रालय, मुंबई.
- सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, ३० वा मजला, सेंटर-१ जा.व्या.केंद्र,कफ परेड मुंबई.
- अवर सचिव, कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग,७ वा मजला, सेंटर-१ जा.व्या.केंद्र,कफ परेड मुंबई.
- वैयक्तिक नस्ती /
- निवड नस्ती (पोल-१).